पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, हिंगोली यांना कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक एमसीटी १२/२०००/१३३०/सीआर१९७/परि-५,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : ३ मार्च,२००१

वाचा:-१)शासन अधिसूचना क्रमांक एमसीटी ०४९८/सीआर २३(ब)/परि ५, दि.११ ऑगस्ट,२०००
२)पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण व जिल्हा व सत्र न्यायाधिश, हिंगोली यांचे पत्र क्रमांक ९६३/२०००, दि.२१.११.२०००

शासन निर्णय:- मोटार वाहन अधिनियम, १९८८ (१९८८ चा ५९) याच्याकलम १६५ द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचावापर करुन शासन अधिसूचना क्रमांक एमसीटी ०४९८/सीआर २३(ब)/परिवहन ५, दिनांक११.८.२००० अन्वये अपर जिल्हा न्यायाधिश हिंगोली यांना हिंगोली जिल्हयातील मोटार वाहन अपघाताच्या नुकसान भरपाईचे दावे चालविण्याचे अधिकार प्रदान करण्यात आले व मोटार अपघात दावा न्यायाधिकरणाची स्थापना करण्यात आली. आता या आदेशान्वये पदसिध्द सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, हिंगोली यांना या कार्यालयाचे कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

२. सदर आदेश शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक विअप्र १०९९/प्र.क्र.१०/९९/विनियम, दि.१.९.९९मधील अ.क्र.३वरील नियम क्रमांक २ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

विजय बागवे

( विजय बागवे )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,
प्रबंधक, उच्च न्यायलय (अपीलशाखा), मुंबई ( पत्रान्वये )
सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण व अपर जिल्हा व सत्र न्यायाधिश, हिंगोली
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, हिंगोली
विधी व न्याय विभाग, कार्यासन १२/ कार्यासन ३
वित्त विभाग (विनियम/ व्यय ८)
गृह विभाग, आस्था-४ (सर्वांचे माहितीसाठी)
निवडनस्ती, परिवहन-५